अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्यास
मुदतवाढ देणेबाबत -
जिल्हा व सत्र न्यायालय यवतमाळ ,
दिनांक ०१ मार्च, २०२० ते ३१ ऑगस्ट, २०२०
या कालावधीसाठी...........

# महाराष्ट्र शासन
## विधि व न्याय विभाग
### शासन निर्णय क्रमांकः पदनि २०२०/प्र.क्र.२८/का.१२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १० नोव्हेंबर, २०२०

**वाचा-**

१ शासन निर्णय विधि व न्याय विभाग क्रमांकः एचसीटी १००२/१२८९/(१६२)/नऊ / चार, दिनांक ०८.०९.२००३
२ शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १२ फेब्रुवारी, २०२०
३ शासन निर्णय विधि व न्याय विभाग क्रमांकः पदनि २०१९/प्र.क्र.५५/का.१२, दिनांक ०४ नोव्हेंबर, २०२०
४ शासन निर्णय विधि व न्याय विभाग क्रमांकः पदनि २०२०/प्र.क्र.२८/का.१२, दिनांक २८ फेब्रुवारी, २०२०
५ प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, जिल्हा व सत्र न्यायालय यवतमाळ यांचे पत्र क्रमांक जा.क्र.२१५३/आस्था/२०२०, दिनांक ०६ ऑगस्ट, २०२०

**प्रस्तावना-**

प्रशासकीय कारणास्तव संदर्भाधीन अ.क्र. (४) येथील दिनांक २८ फेब्रुवारी, २०२० रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहे. सुधारीत शासन निर्णय पुढीलप्रमाणे आहे :

## शासन निर्णय-

शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्रमांक पदनि २०२०/प्र.क्र.२८/का.१२, दिनांक २८ फेब्रुवारी, २०२० अधिक्रमित करण्यात येत आहे.

२. संदर्भाधीन दिनांक ०४ नोव्हेंबर, २०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये जिल्हा व सत्र न्यायालय यवतमाळ यांच्या आस्थापनेवरील १५१ अस्थायी पदांना दिनांक २९ फेब्रुवारी, २०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. संबंधित न्यायालयांचे कामकाज सुरळीत सुरु राहण्यासाठी खाली दर्शविलेल्या तक्त्यात नमूद केल्यानुसार १४८ अस्थायी पदांना दिनांक १ मार्च, २०२०ते ३१ ऑगस्ट, २०२० या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | दिनांक २९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ दिलेली पदे | दिनांक ०१.०३.२०१९ ते २९.०२.२०२० या कालावधीत नव्याने निर्माण केलेली पदे | पदनिर्मितीचा / पदे कमी केल्याचा शासन निर्णय क्रमांक व दिनांक | दिनांक ०१.०३.२०२० पासून ३१.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ द्यावयाची पदे |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | अधिक्षक | २ | | शासन ज्ञापन, विधि व न्याय विभाग क्रमांक कंत्राटी २६१७/प्र.क्र. १४२/का.१२, दिनांक २५.११.२०१९ अन्वये जिल्हा व सत्र न्यायालय यवतमाळ व नियंत्रणाखालील न्यायालयांसाठी सफाईगार पदाचे काम कंत्राटी पद्धतीने बाह्ययंत्रणेद्वारे करुन घेण्यासाठी क्षेत्रफळनिहाय निविदेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. | २ |
| २ | सहायक अधिक्षक | ९ | | | ९ |
| ३ | लघुलेखक उच्चश्रेणी | १ | | | १ |
| ४ | लघुलेखक निम्नश्रेणी | ९ | | | ९ |
| ५ | टंकलेखक | १ | | | १ |
| ६ | वरिष्ठ लिपिक | २१ | | | २१ |
| ७ | कनिष्ठ लिपिक | ५२ | | | ५२ |
| ८ | सफाईगार | ७ | | | ७ |
| ९ | कंत्राटी सफाईगार | ३ | -३ | | ० |
| १० | वाहनचालक | १ | | | १ |
| ११ | पहारेकरी | ३ | | | ३ |
| १२ | कंत्राटी पहारेकरी | ३ | | | ३ |
| १३ | मुख्य बेलिफ | ३ | | | ३ |
| १४ | बेलिफ | १७ | | | १७ |
| १५ | पुस्तक बांधणीकार | १ | | | १ |
| १६ | शिपाई | १८ | | | १८ |
| | एकूण | १५१ | | | १४८ |

२. विधि व न्याय विभाग कार्यासन ९ यांचेकडून मुदतवाढ मिळणारी पदे या शासन निर्णयातून वगळली आहेत.

३. यासाठी येणारा खर्च "२०१४-न्यायदान" या मुख्य लेखाशीर्षाखाली १०५ (दोन) जिल्हा व सत्र न्यायाधिश", “१०५-(तीन) दिवाणी न्यायाधिश" व "१०८ फौजदारी न्यायालये" यांपैकी योग्य त्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या लेखाशीर्षाखालील संबंधित वित्तिय वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र २०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ नुसार वित्तिय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग तीन मधील अ.क्र. ४ चा परिच्छेद क्र.२७(२) (क) अन्वये तसेच, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १२ फेब्रुवारी, २०२० अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१११०१४२९५६६६१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BHAGYASHREE
RAJENDRA BHAIDKAR

Digitally signed by BHAGYASHREE RAJENDRA BHAIDKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, postalCode=400032,
st=Maharashtra,
2.5.4.20=d567849462918ceb7579bb2b56247e927c039bbdf028022a8
b9ce837a7c854bb,
serialNumber=fb84fefefe4ee219c1bc35b35201c14eab0903e8194a74
13a74eed93f32afdb0, cn=BHAGYASHREE RAJENDRA BHAIDKAR
Date: 2020.11.10 14:35:48 +05'30'

**( भाग्यश्री भाईडकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय मुंबई,
२. प्रबंधक (निरीक्षणे-१), मा.उच्च न्यायालय मुंबई,
३. प्रबंधक, मा.उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ नागपूर, औरंगाबाद
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-एक, महाराष्ट्र मुंबई,
५. महालेखापाल (लेखापरीक्षा) एक, महाराष्ट्र मुंबई,
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) दोन, महाराष्ट्र नागपूर,
७. महालेखापाल (लेखापरीक्षा) दोन, महाराष्ट्र नागपूर,
८. सह सचिव, विधि व न्याय विभाग, नागपूर, औरंगाबाद,
९. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, यवतमाळ,
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ,
११. उप कोषागार अधिकारी, यवतमाळ,
१२. वित्त विभाग, आ.पु.क., व्यय-५, अर्थसंकल्प ११, मंत्रालय, मुंबई
१३. विधि व न्याय विभाग, कार्यासन २३ व २४,
१४. निवडनस्ती (का.१२).